**एकात्मिक बाल विकास सेवा योजना ( १९-आहार खर्च) हया केंद्र पुरस्कृत योजनेसाठी सन २०२० च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात मंजूर पुरवणी मागणी रु.३०४.७८ कोटी पैकी रु.८१.०० कोटी (केंद्र हिस्सा ५०% व राज्य हिस्सा ५०%) इतका निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०२०/प्र.क्र.११/का-५**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३१ मार्च, २०२०

**वाचा :-** वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक १३/३/२०२०

**प्रस्तावना :-**

एकात्मिक बाल विकास सेवा योजना (आहार खर्च) ही केंद्रपुरस्कृत योजना आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई या कार्यालयाकडून राबविण्यात येत आहे. या योजनेंतर्गत लाभार्थ्यांना गरम ताजा आहार व THR चे वितरण करण्यात येते. या योजनेकरीता केंद्र हिस्सा ५०% व समरुप राज्य हिस्स्या ५०% याप्रमाणे निधीचे प्रमाण ठरविण्यात आले आहे.

२. केंद्र शासनाने राज्यात राबवावयाच्या पूरक पोषण आहार योजनेसाठी सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीता केंद्र हिस्सा ५०% (लेखाशिर्ष २२३६१९२७) रु.६०५.६०७२ कोटी व समरुप राज्य हिस्सा ५०% (लेखाशिर्ष २२३६१९३६) रु.६०५.६०७२ कोटी याप्रमाणे एकंदर रु.१२११.२१४४ कोटी इतका APIP मंजूर केला आहे.

या योजनेकरीता सन २०१९-२० च्या राज्याच्या मुळ अर्थसंकल्पात एकात्मिक बाल विकास सेवा योजना (आहार खर्च) याअंतर्गत मागणी क्रमांक एक्स-१,(०८)(०३) एकात्मिक बाल विकास सेवा योजना (आहार खर्च) (केंद्र हिस्सा ५०%) (कार्यक्रम) १९, आहार खर्च (२२३६१९२७) याखाली रु.५४८.७६ कोटी व समरुप मागणी क्रमांक एक्स-१,(०८)(०४) एकात्मिक बाल विकास सेवा योजना (आहार खर्च) (राज्य हिस्सा ५०% ) (कार्यक्रम) १९, आहार खर्च (२२३६१९२७) याखाली रु.५४८.७६ कोटी याप्रमाणे एकंदर रु.१०९७.५२ कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे.

तसेच, सन २०१९ च्या पावसाळी अधिवेशनात रु.२००.०० कोटी व हिवाळी अधिवेशनात रु.२००.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत करुन योजनेवरील खर्चाकरीता आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांना वितरीत करण्यात आला आहे.

सद्य:स्थितीत महाराष्ट्र विधानमंडळाच्या सन २०२० च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात देण्यात आलेल्या मान्यतेने या योजनेकरीता रु.३०४.७८ कोटी इतका निधी पुरवणी मागणीव्दारे अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. सदर निधीपैकी २०१९-२० च्या खर्चाकरीता रु.८१.०० कोटी (केंद्र व राज्य हिस्सा मिळून) निधी वितरीत व खर्च करण्यास वित्त विभागाने मान्यता दिली आहे. त्यानुसार या योजनकेरीता केंद्र हिस्सा ५०% याखाली रु.४०.५० कोटी व राज्य हिस्सा ५०% याखाली रु.४०.५० कोटी याप्रमाणे एकूण रु.८१.०० कोटी इतका निधी

वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने पुढीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमीत करण्यात येत आहे.

**शासन निर्णय** :-

एकात्मिक बाल विकास सेवा योजना (आहार खर्च) या योजनेवरील सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील खर्चाकरीता केंद्र हिस्सा ५०% (लेखाशिर्ष २२३६१९२७) रु.४०.५० कोटी व समरुप राज्य हिस्सा ५०% (लेखाशिर्ष २२३६१९३६) रु.४०.५० कोटी याप्रमाणे एकंदर रु.८१.०० कोटी इतकी तरतूद पुरवणी मागणीव्दारे अर्थसंकल्पीत केलेल्या रक्कमेपैकी वितरीत व खर्च करण्याकरीता उपलब्ध करुन देण्यात आली आहे.

या योजनेवरील सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील खर्चाकरीता सन २०२० च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात मंजूर पुरवणी मागणीव्दारे अर्थसंकल्पीत करण्यात आलेली केंद्र हिस्सा (५०%) याखाली रु.४०.५० कोटी व समरुप राज्य हिस्सा (५०%) याखाली रु.४०.५० कोटी याप्रमाणे एकूण रु.८१.०० कोटी इतका निधी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांना वितरीत व खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. या योजनेंतर्गत सन २०२० च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात पुरवणी मागणीव्दारे तरतूद या शासन निर्णयान्वये पुरक पोषणांतर्गत आहार खर्च या कार्यक्रमासाठी केंद्र हिस्सा (५०%) (लेखाशिर्ष संकेतांक २२३६१९२७) याखाली रु.४०.५० कोटी व समरुप राज्य हिस्सा (५०%) (लेखाशिर्ष संकेतांक २२३६१९३६) याखाली रु.४०.५० कोटी याप्रमाणे एकूण रु.८१.०० कोटी (अक्षरी रु.एक्याऐंशी कोटी फक्त) इतका उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी हा गरम ताजा आहार व THR यासाठी समप्रमाणात वितरीत करण्याची दक्षता आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी घ्यावी.

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक ६९/व्यय-६, दिनांक ३१ मार्च, २०२० अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००६०२१३०३१५८४३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, serialNumber=4ca059ab7b8d64aaf749fe58e0a714a015f521cb28fd2204e49a4d81f12a5745, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2020.06.02 13:10:16 +05'30'

(ला.रा.गुजर)
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
४) मा. मंत्री/राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. विरोधी पक्ष नेता (विधानसभा/विधानपरिषद), विधानभवन,मुंबई.

६) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे स्वीय सहाय्य, मंत्रालय, मुंबई-३२
७) सचिव (महिला व बालविकास विभाग), मंत्रालय, मुंबई.
८) आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९) आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना,रायगड भवन, नवी मुंबई.
१०) सर्व जिल्हाधिकारी.
११) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
१२) सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास.
१३) सर्व महिला व बाल विकास अधिकारी, (जिल्हा परिषद).
१४) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी/ग्रामीण/आदिवासी) प्रकल्प.
१५) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
१६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१७) निवासी लेखा परिक्षा अधिकारी मुंबई
१८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१९) कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (का.१४७२)/ वित्त विभाग (व्यय-६) मंत्रालय, मुंबई.
२०) अवर सचिव (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना कळविण्यात येते की, त्यांनी एकात्मिक बाल विकास सेवा योजना (आहार खर्च) या प्रयोजनार्थ सन २०१९-२० च्या खर्चाकरीता सन २०२० च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात पुरवणी मागणीव्दारे अर्थसंकल्पीत करण्यात आलेला व वित्त विभागाने वितरीत व खर्च करण्याकरीता उपलब्ध करुन देण्यात आलेला केंद्र हिस्सा (लेखाशिर्ष २२३६१९२७) रु.४०.५० कोटी व समरुप राज्य हिस्सा (लेखाशिर्ष २२३६१९३६) रु.४०.५० कोटी याप्रमाणे एकूण रु.८१.०० कोटी इतका निधी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांना BDS प्रणालीवर वितरीत करावा.
२१) निवड नस्ती कार्या-५, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

-----------------